राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत मौजे गणेशपूर (ग्रा.प.गणोरी), ता.फुलंब्री, जि. औरंगाबाद या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र.२९६/पापु १८

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: ०४ जानेवारी, २०१९

<u>वाचा -</u>

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र.जिपऔ/ पापु/ तांशा/२०१८/२३३५, दिनांक २१/१२/२०१८.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र. ५२/पापु-०७ दि. ९.१०.२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-७, दि.१७/०३/२०१०
४) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-७, दि. २२ जानेवारी, २०१४.
५) शासन निर्णय क्रमांकः क्र. ग्रापाधो-१११४/प्र.क्र. २२/पापु-०७ दि. ०९.०७.२०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो/१११४/प्र.क्र. ५२/पापु-०७ दि. १७.१०.२०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो/१११५/प्र.क्र.२२/पापु-७/दि.१६/०२/२०१५.
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो/११११/प्र.क्र.१३४/पापु-७/२०/०२/२०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो/१११४/प्र.क्र.६१/पापु-७, दि.१५/६/२०१५.

<u>प्रस्तावना</u> :-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे गणेशपूर (ग्रा.प.गणोरी), ता.फुलंब्री, जि. औरंगाबाद या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये शासनास मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेच्या रु. ४५.७५ लक्ष किंमतीच्या अंजादपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, औऱंगाबाद यांनी तांत्रिक संम्मती दिली आहे. तदनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

मौजे गणेशपूर (ग्रा.पं.गणोरी), ता.फुलंब्री, जि. औरंगाबाद या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.४५७६ एवढया वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. ४३,५४,०००/- (ढोबळ) (अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख चोपन्न हजार) किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुढील अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजनेची देखभाल दुरुस्तीची जबाबदारी कंत्राटदारावर बंधनकारक राहील.

(२) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.

(३) योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत. सदर अटीची पुर्तता न करताच कार्यारंभ आदेश दिल्यास या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्य समजण्यात येईल.

(४) योजनेची कामे मंजुर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्पा-टप्याने पूर्ण करणत यावीत.

(५) योजनेचा उदभव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उदभवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरची याेजनेतील इतर कामे करावीत.

(६) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी सविस्तर प्रकल्प अहवालात दर्शविलेला खर्चाचा तपशिल दुरुस्त करून सदर खर्च किमान ठेवावा. तसेच सदर खर्च भागविण्याकरिता व योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी किमान पाणी पटटीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

(७) योजना चालविणे, त्याचे परिक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस /जिल्हा परिषरदेस शासनाकडून कोणतीही मदत /अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

(८) अस्तित्वातील स्तोत्रांचे बळकटीकरण करण्यात यावे.

(९) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

(१०) संदर्भाधीन क्र.४ येथील २२ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीचे धोरण राबविण्यात यावे.

(११) सदर योजनेच्य तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच प्रचलित शासन निर्णयातील तरतुदीनुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.

(१२) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपटटी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्य कामास सुरुवात करावी.

(१३) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंतिध अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राही.

(१४) योजनेच्या अंमलबजावणी मध्ये कोणतयाही स्वरूपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

(१५) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगितता प्रामणपत्र व योजनेच्या पुर्णत्वाचे दाख संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त करून घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), यांची राहील.

(१६) योजना प्रचलीत शासन धोरणानुसार राबविण्यात येत आहे याची दक्षता घ्यावी.

(१७) ग्रामपंचायतीकडे विजबील थकबाकी असल्यास ती पुर्ण भरल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये.

(१८) पूर्वीच्या योजनेचे लेख आर्थिकदृष्टया पूर्ण केले आहेत किंवा कसे ही बाब तपासणे संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. लेख पूर्ण करणे आवश्यक आहे.

२. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या केंद्र तथा राज्य निधीतुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेताक २०१९०१०४१६१०३२३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2019.01.08 13:30:59 +05'30'

(सु.स.राठोड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई

९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१५) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.